**महासंचालक, विशेष कृती, महाराष्ट्र राज्य, मुंबई या पदाची कार्यकक्षा निश्चित करणे बाबत**

# महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन निर्णय क्र. आयपीएस-१७०९/प्र.क्र.३००/पोल-१
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक ०१ सप्टेंबर, २००९

**वाचा :** शासन निर्णय क्र. आयपीएस-१२०८/प्र.क्र.२७७/ पोल-१, दि.१६ जुलै,२००९

**प्रस्तावना :-** मुंबईवर दिनांक २६.११.२००८ रोजी झालेल्या दहशतवादी हल्ला व वाढत्या नक्षलवादी कारवाया यांचा बीमोड करण्यासाठी महासंचालक, विशेष कृती, महाराष्ट्र राज्य, मुंबई या पदाची निर्मिती करण्यात आली आहे. महासंचालक, विशेष कृती हे दहशतवाद विरोधी पथके व विशेष कृती दल यांचे नियंत्रण करणार आहेत. त्यानुसार महासंचालक, विशेष कृती, महाराष्ट्र राज्य, मुंबई या पदाच्या कार्यकक्षेबाबत शासन आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णय :-**

महासंचालक, विशेष कृती, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे मुख्यालय मुंबईत राहील व त्यांचे अधित्त्याखालील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते त्यांचे कार्यालयामार्फत अदा करण्यात येतील.

२. महासंचालक, विशेष कृती, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालयाशी संबंधित कामकाजाच्या गोपनीयतेचे स्वरुप विचारात घेता, त्यांचे अधित्त्याखालील सर्व अधिकारी/कर्मचारी वर्ग पोलीस दलातून उपलब्ध करण्यात यावा आणि त्यांना गोपनीयतेची शपथ घेणे आवश्यक राहील.

३. महासंचालक, विशेष कृती, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेशी संबंधित कामकाजाची गोपनीयता व कामकाजाचे स्वरुप यांचा विचार करता, या कार्यालयास अभियान व गुप्त सेवा यासाठी स्वतंत्र निधी उपलब्ध करण्यात यावा.

४. पोलीस उपअधीक्षक/पोलीस अधीक्षक दर्जाचे राज्य पोलीस नियंत्रण कक्षामध्ये नियुक्त करण्यात येणारे अधिकारी, दहशतवाद विरोधी पथक, गुप्तवार्ता विभाग, राज्य राखीव पोलीस बल व पोलीस उपआयुक्त(विशा-२) यांच्यामध्ये योग्य समन्वयासाठी कर्तव्यदक्ष अधिकारी व कर्मचारी वर्ग या दलामध्ये नियुक्त करण्यात यावेत.

५. या दलास **Interception, Jamming** सुरक्षित दळणवळण यंत्रणा उपलब्ध करुन देण्याबाबत मू भूत सुविधा दहशतवाद विरोधी पथक व फोर्स-१ कडे यांनी उपलब्ध करुन दयावी.

६. विशेष कृती पथकासाठी प्रशिक्षण देण्याबाबत, UOTC मार्फत, नक्षलग्रस्त भागात असलेल्या पथकास प्रशिक्षण वडाची वाडी, पुणे येथे नागरी भागातील दहशतवादाचा मुकाबला करण्यासाठी प्रशिक्षण केंद्र स्थापन करुन तेथे फोर्स-१ मार्फत प्रशिक्षण देण्याबाबत, पोलीस महासंचालक यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

७. महासंचालक, विशेष कृती, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना त्यांचे अधिपत्याखालील अधिकारी/ कर्मचारी यांचे कौशल्य वाढविण्यासाठी, विविध खाजगी क्षेत्रातील तज्ञ व्यक्तींच्या सेवा घेण्यासाठी वरिष्ठ अधिका ांची विशेष समिती नेमण्यात यावी व त्यांनी सुचविलेल्या पॅनेलमधून तज्ञ व्यक्तींच्या सेवा घेण्यात याव्यात. तसेच आपत्कालीन परिस्थितीच्यावेळी मुकाबला करण्यासाठी व शोध माहिमेसाठी हेलिकॉप्टर चा वापर करण्याबाबत आवश्यकतेनुसार शासनाची मान्यता घेण्यात यावी.

८. महासंचालक, विशेष कृती, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी विशेष मोहिमेच्या वेळी प्रसार माध्यमांना प्रचलित शासकीय नियमांनुसार प्रसार माध्यमांना माहिती देण्यास हरकत नसावी.

९. महासंचालक, विशेष कृती यांच्या अधिपत्याखालील दलाचा **Organisational chart** सोबत जोडला ाहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २००९०९०११७११४०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( कैलास वि. बिलोणीकर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति :

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा.मुख्य सचिव यांचे सचिव,
४. मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव
६. मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव,
७. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८. प्रधान सचिव (विशेष) गृह विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
९. प्रधान सचिव (अ.व सु.) गृह विभाग यांचे स्वीय सहायक,
१० महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा) महाराष्ट्र,मुंबई / नागपूर
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२ निवासी लेखा अधिकारी,मुंबई
१३. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,मुंबई
१४. महासंचालक, विशेष कृती, महाराष्ट्र राज्य,मुंबई
१५. अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, मुंबई
१६. पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई
१७. आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य,मुंबई
१८. विशेष पोलीस महानिरीक्षक (सर्व परिक्षेत्र)
१९. पोलीस आयुक्त (सर्व)
२०. पोलीस अधीक्षक (सर्व)
२१. बीयुडी-१/ पोल-१ अ/ पोल-३/विशा-१ब/ विशा-४ कार्यासने, गृह विभाग
२२. निवड नस्ती / पोल-१.


Organisational Chart of DGP (Spl.Ops)
DGP (Spl. Ops.)*
IG (Int.)
DIG / Staff Officer*
SP (Ops)
SP (Research)
ADG / ATS
IG / ANO
DIG – I ATS
DIG – II ATS
DIG F-I
SP / * TECH
SP / * Int & Res.
ANO
DIG * Gadchiroli
SP / Nax. INT. & Res.
Comdt./ UOTC
SP-I
SP-II
SP (Ops.)
Comdt. UOTC
SP/Gadchiroli
SP/Aheri*
SP/Gondia
SP/SAG

(* New Posts)